स्वयंसेवी संस्थांनी चालविलेल्या अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांची वसतीगृहे व आश्रमशाळांना सहाय्यक अनुदाने वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.**
**शासन निर्णय क्रमांक :- बीसीएच-२०११/प्र.क्र.३०६ /मावक-४**
**हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.**
**दिनांक :- ३० ऑगस्ट २०११**

पहा :- शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अंदाज-२०११/प्र.क्र.९३/२०११/ अर्थसंकल्प-३, दिनांक ०६.०५.२०११

**शासन निर्णय** :-

सामाजिक न्याय विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांनी चालविलेल्या अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांची वसतीगृहे व आश्रमशाळांना सन २०११-१२ या आर्थिक वर्षात मंजूर वित्तीय तरतूदीच्या ७५% सहाय्यक अनुदाने बी.डी.एस. वर उपलब्ध करून देण्यात आलेले आहेत. सामाजिक न्याय विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविलेल्या आश्रमशाळा व वसतीगृहातील विद्यार्थ्यांना सोयीसुविधा पुरविण्यासाठी राबविण्यात येणाऱ्या योजनांना पुढीलप्रमाणे निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उलब्ध करून देण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | योजनेचे नाव | लेखाशिर्ष | सन २०११-१२ ची अर्थसंकल्पीय तरतूद (रू.लक्ष) | वित्त विभागाच्या मान्यतेनुसार बी.डी.एस.द्वारे वितरीत करावयाची तरतूद (रू.लक्ष) |
|---|---|---|---|---|
| १ | स्वयंसेवी संस्थांच्या अनुसूचित जातीच्या मुलामुलींकरीता असलेल्या आश्रमशाळांना सहाय्यक अनुदाने | २२२५-३७७२ | ५०६.५० | २५४.०० |
| २ | स्वयंसेवी संस्थांच्या मागासवर्गीय वसतीगृहांना सहाय्यक अनुदाने | २२२५-३८७-९ | ६९९.९९ | ३५०.०० |
| ३ | स्वयंसेवी संस्थांच्या मागासवर्गीय वसतीगृहांना सहाय्यक अनुदाने - मुंबई | २२२५-२१३-९ | १४.०० | ७.०० |
| ४ | स्वयंसेवी संस्थांच्या मागासवर्गीय वसतीगृहांना सहाय्यक अनुदाने | २२२५-०५३-९ | ७९५६.८१ | ४०००.०० |

२.		प्रस्तावित वितरीत करावयाचा निधी खर्च केल्यानंतर त्याबाबतची जिल्हानिहाय खर्चाची माहिती तसेच सदर संस्थातील प्रत्यक्ष विद्यार्थी संख्या आकृतीबंधाप्रमाणे मान्य केलेल्या कर्मचाऱ्याचे वेतन अदा करण्याच्या अधीन राहून तसेच उर्वरित कालावधीसाठी आवश्यक निधीची विगतवारी सर्व संबंधित जिल्ह्याकडून संचालक, समाजकल्याण, पुणे यांनी शासनास सादर करणे आवश्यक राहील. विहित वेळेत अनुदानित वसतीगृहे व संवयंसेवी संस्थांच्या आश्रमशाळांच्या जिल्हानिहाय खर्चाची माहिती प्राप्त झाली नाही आणि उर्वरित निधी वितरित करण्यास वित्त विभागामार्फत विलंब झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

३.		सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४१/व्यय-१४, दि.१७.८.२०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४.		सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०८३०१५४१३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**(शि.सो.चौरे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा परिक्षा) (लेखा अनुज्ञेयता ) मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा परिक्षा) (लेखा अनुज्ञेयता ) नागपूर.
सर्व जिल्हाधिकारी,
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी,
सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षक, मुंबई / मुंबई उपनगर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
अवर सचिव, व्यय-१४, वित्त.विभाग, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव, अर्थसंकल्प, सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती-मावक-४.